सह संचालक (अतांत्रिक), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई या पदावर प्रतिनियुक्ती देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः प्रतिनि २०२१/प्र.क्र.२८७/सेवा-२**
गो.ते.रुग्णालय इमारत संकुल,१० वा मजला,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
तारीख: २७ डिसेंबर, २०२१.

**वाचा :-**

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३८/कार्यासन-१२, दि.१७.१२.२०१६.

२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.५१०/कार्या.१२, दि.१६.०२.२०१८.

**शासन आदेश :-**

श्री. संजय शेषराव सरवदे, उप जिल्हाधिकारी (निवडश्रेणी) यांची "सहसंचालक (अतांत्रिक), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई" या पदावर **एक** वर्षासाठी खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे -

अ) सह संचालक (अतांत्रिक), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई हे पद वेतनश्रेणी एस-२६:८२२००-२११५०० मधील असून, श्री. संजय सरवदे हे सदर पदावर प्रतिनियुक्तीने कार्यरत असेपर्यंत अथवा पुढील आदेशापर्यंत हे पद श्रेणी अवनत करण्याच्या अधीन राहून नियुक्ती करण्यात येत आहे.

ब) श्री. संजय सरवदे, उप जिल्हाधिकारी (निवडश्रेणी) हे सह संचालक (अतांत्रिक), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई या पदावर रूजू झाल्याच्या तारखेपासून त्यांच्या प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल आणि ज्या तारखेला ते आपल्या मूळ पदाचा कार्यभार पुन्हा स्विकारतील त्या तारखेस त्यांची प्रतिनियुक्ती संपुष्टात येईल.

क) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन / सक्षम प्राधिकारी म्हणजे महसूल व वन विभागास राहील.

ड) जर त्यांची सेवा स्वीयेतर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठविण्याची मुभा शासनास म्हणजेच सार्वजनिक आरोग्य विभागास राहील. मात्र, याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी या विभागाने महसूल व वन विभागास तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे.

ई) जर त्यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे, अशी कमीत कमी तीन महिन्यांची नोटीस सार्वजनिक आरोग्य विभागास दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठविण्यास येईल.

फ) श्री. संजय सरवदे यांना महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा, निलंबन व बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील तरतूदी लागू राहतील.

२.    श्री. संजय सरवदे, उप जिल्हाधिकारी (निवडश्रेणी) यांच्या सेवाविषयक बाबी त्यांच्या मूळ विभागामार्फत हाताळल्या जातील.

३.    श्री. संजय सरवदे, उप जिल्हाधिकारी (निवडश्रेणी) यांनी प्रतिनियुक्तीच्या पदावर हजर होऊन तसा अनुपालन अहवाल शासनास व संबंधितांस सादर करावा.

४.    सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.om या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२२७१५२०५७९७१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Chandrakant Haridas Wade

Digitally signed by Chandrakant Haridas Wade
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice & Special Assist Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7a8cb09a73bc92b24a171080ebd81893480c90bedd57685ea1ce3af533f64bce, serialNumber=9474e7143b2bc3fd96e8d7bf07d1ce51de8461d4c34ae1e3f643c11b54523936, cn=Chandrakant Haridas Wade
Date: 2021.12.28 11:16:23 +05'30'

(चंद्रकांत ह. वडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
२) संचालक, आरोग्य सेवा (१), मुंबई
३) संचालक, आरोग्य सेवा (२), पुणे
४) अतिरिक्त अभियांन संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
५) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई
६) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१ मुंबई /महाराष्ट्र-२ नागपूर
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई /महाराष्ट्र-२ नागपूर
८) निवासी लेखा अधिकारी, मुंबई
९) मा. मंत्री (सार्वजनिक आरोग्य विभाग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१०) मा. मंत्री (महसूल व वन विभाग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
११) मा. राज्यमंत्री (सार्वजनिक आरोग्य विभाग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुबई
१२) अपर मुख्य सचिव ,सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
१३) श्री. संजय शेषराव सरवदे, उप जिल्हाधिकारी (निवडश्रेणी) (सध्या मा. उपाध्यक्ष, विधानसभा यांचे विशेष कार्य अधिकारी)
१४) निवडनस्ती.